**जलसंपदा विभागांतर्गत महामंडळे व अंतर्गत असलेल्या कार्यालयांचे लेख्याचे संगणकीकरण - समिती सदस्य, श्री. शिलानाथ जाधव, निवृत्त संचालक, लेखा व कोषागारे यांचे मानधन व भत्ते निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१८/१६८/प्र.क्र.११ /२०१८/लेखा**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- २८ नोव्हेंबर, २०१८.

वाचा:- १. संकीर्ण २०१७/(३८/२०१४)/लेखा दि. २२.७.२०१५
२. संकीर्ण २०१७/(३८/२०१४)/लेखा दि. १६.५.२०१७

प्रस्तावना -

श्री. शिलानाथ जाधव निवृत्त संचालक लेखा व कोषागारे, महाराष्ट्र यांना संदर्भ क्र.२ अन्वये जलसंपदा विभागातंर्गत महामंडळे व त्याअंतर्गत असलेल्या कार्यालयांच्या लेख्यांचे संगणकीकरण करण्याच्या हेतूने गठित करण्यात आलेल्या समितीमध्ये सदस्य म्हणून नियुक्त केलेले आहे. समितीतील ९ सदस्यांपैकी ८ सदस्य हे कार्यरत शासकीय अधिकारी असून श्री. शिलानाथ जाधव हे निवृत्त संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र आहेत.

श्री. जाधव यांना मानधन व भत्ते मंजूर करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. त्यासंबंधात वित्त विभागाशी विचारविनिमय केल्यानंतर श्री. शिलानाथ जाधव, समिती सदस्य यांना पुढीलप्रमाणे मानधन देण्यास शासन मान्यता देत आहे.

| क्र. | बाब | मानधन |
|---|---|---|
| १. | प्रतिदिन मानधन | रू.२२६०/- |

२. उपरोक्त मानधन व भत्ते पुढील अटी /शर्तीच्या अधीन राहतील.

१. समितीच्या दरमहा कमाल कामकाजाच्या दिवसांची मर्यादा २० (वीस) दिवस इतकी असेल.
२. कामाच्या अनुषंगाने दूरध्वनी फॅक्स, झेरॉक्स, टंकलेखन इत्यादी प्रित्यर्थ केलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती देयकाच्या /प्रमाणकाच्या आधारे करण्यात येईल. मात्र भोजनादी खर्च (Boarding charges) मानधनात अंतर्भूत असल्याने त्यासाठी स्वतंत्र प्रतिपूर्ती अनुज्ञेय नाही.
३. समितीच्या कामकाजासाठी उपस्थित रहाण्यासाठी (प्रत्यक्षात केलेला प्रवास व दैनिक भत्ता शासन निर्णय दि.३.३.२०१० मधील परिच्छेद १२ प्रमाणे व बैठक भत्ता शासन निर्णय दि.२४.५.२०१२ मधील तरतुदीनुसार अनुज्ञेय राहिल.) प्रत्यक्षात केलेल्या प्रवास खर्चाची व बैठक भत्त्याची प्रतिपूर्ती मानधना व्यतिरिक्त अनुज्ञेय असेल.
४. प्रत्येक महिन्यातील कामाचे दिवस व त्या दिवशी केलेल्या कामाची संक्षिप्त टिप्पणी स्वयंप्रमाणित करून समिती अध्यक्षांची / सह अध्यक्षांची प्रतिस्वाक्षरी घेऊन सदस्य सचिव यांना पाठवणे आवश्यक राहील. जेणेकरून मानधन व अन्य अनुज्ञेय खर्चाची प्रतिपूर्ती करणे सुलभ होईल.
५. सदर मानधन व भत्ते यावर होणारा खर्च अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, मंत्रालय, मुंबई यांनी कार्यालयीन खर्च या प्रयोजनासाठी उपलब्ध असलेल्या तरतुदीतुन भागविण्यात यावा.
६. समितीने त्यांचा अहवाल दि.३१.०१.२०१९ पर्यंत शासनास सादर करण्यात यावा.
७. श्री.जाधव यांना दि.३१.०१.२०१९ पर्यंत पर्यंत निश्चित केलेल्या दराने मानधन मंजूर करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक सं. क्र.२४४ दि. २०.१०.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०१८११२८१६३४४६४३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Uddhav Rabhaji Dahiphale

Digitally signed by Uddhav Rabhaji Dahiphale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=05b3ca49b9a0a924fd4d8743e6e254e742308f02108527986e098afc27201f30, cn=Uddhav Rabhaji Dahiphale
Date: 2018.11.28 16:42:05 +05'30'

**( उद्धव दहिफळे )**
आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव

**प्रत,**

१. मा. मंत्री. जलसंपदा, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री, जलसंपदा, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव
३. प्रधान सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई
४. प्रधान सचिव वित्त विभाग, मंत्रालय मुंबई
५. सचिव (लाक्षेवि) जलसंपदा विभाग, मंत्रालय मुंबई
६. सचिव (प्रकल्प व समन्वय) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग
८. सर्व कार्यकारी संचालक जलसंपदा विभाग
९. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, मंत्रालय, मंबई
११. लेखा कार्यासन संग्रहार्थ.